**सेवेत असतांना दिवंगत झालेल्या विजाभज आश्रमशाळा/ निवासीशाळा/ विद्यानिकेतन/ ऊसतोड कामगारांच्या मुलांसाठीच्या आश्रमशाळांमधील शिक्षक / शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या नातेवाईकास अनुकंपा तत्वावर नियुक्ती देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन,**
**विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागासप्रवर्ग विभाग,**
**शासन निर्णय, क्रमांक विभशा-२०१८/प्र.क्र.७०/विजाभज-२,**
पहिला मजला (विस्तार), मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : २४/०९/२०१८.

वाचा :-

१) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र.विभशा-२००७/ प्र.क्र.२४/ मावक-६, दिनांक २३/१०/२००७.
२) या विभागाचा समक्रमांकाचा शासन निर्णय दिनांक २२/३/२०१८.
३) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक अकंपा-१०१०/प्र.क्र.३०८/१०/आठ, दिनांक ६/१२/२०१०.
४) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र.इडीडी-२०१६/ प्र.क्र.२३३/ अ.क.१, दिनांक २९/०५/२०१७.

प्रस्तावना:-

सेवेत असतांना दिवंगत झालेल्या विजाभज आश्रमशाळा/ निवासीशाळा/ विद्यानिकेतन/ ऊसतोड कामगारांच्या मुलांसाठीच्या आश्रमशाळांमधील शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या नातेवाईकास अनुकंपा तत्वावर नियुक्ती देण्याबाबत वाचा येथील क्र.१ नुसार सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट-अ मधील नियमावलीमध्ये वाचा येथील क्र.२ मध्ये नमूद केलेल्या शासन निर्णयान्वये काही सुधारणा केलेल्या आहेत.

वाचा येथील क्र.१ च्या शासन निर्णयान्वये अनुकंपा तत्वावर उमेदवारांची नियुक्ती करण्यासाठी उच्च वयोमर्यादेची अट वयाची ४० वर्ष पूर्ण अशी विहित केलेली आहे. तथापि, वाचा येथील क्र.३ च्या सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णयान्वये उच्च वयोमर्यादा दिनांक ६/१०/२०१० पासून ४५ वर्षे इतकी त्याचप्रमाणे क्र.४ येथील दिनांक २९/५/२०१७ च्या शासन निर्णयान्वये सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने कमाल वयोमर्यादेत ४० वर्षावरुन ४५ वर्ष इतकी वाढ दिनांक ६/१२/२०१० पासून लागू केलेली आहे.

शासन अधिसूचना दिनांक ९/३/२०१७ नुसार विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागासप्रवर्ग विभागाची दिनांक १/४/२०१७ पासून निर्मिती झाली

असल्याने या विभागामार्फत चालविण्यात येत असलेल्या आश्रमशाळांतील अनुकंपा तत्वावरील कर्मचाऱ्यांच्या नियुक्तीच्या अनुषंगाने कमाल वयोमर्यादा सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णयात नमूद केल्याप्रमाणे विहित करण्याची बाबत शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सेवेत असतांना दिवंगत झालेल्या विजाभज आश्रमशाळा/ निवासीशाळा/ विद्यानिकेतन/ ऊसतोड कामगारांच्या मुलांसाठीच्या आश्रमशाळांमधील शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या नातेवाईकास अनुकंपा तत्वावर नियुक्ती देण्याबाबत सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक अकंपा-१०१०/प्र.क्र.३०८/१०/आठ, दिनांक ६/१२/२०१० याद्वारे अंगिकृत करण्यात येत आहे. त्यानुसार आश्रमशाळांमधील शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या नातेवाईकास अनुकंपा तत्वावर नियुक्तीसाठी कमाल वयोमर्यादा वयाची ४५ वर्षे इतकी राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१८०९२५११४४५५३३२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Bhaurao Raghunath Gavit

Digitally signed by Bhaurao Raghunath Gavit
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=VJNT OBCS SBC Welfare Dept., postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=692454783803b1bf08be0ff2505a01eb578c61edfbb827457be5704f5b440067, serialNumber=950bc6a64b0801087d4b403d7351619557bcd3489ca14b4e0f644bf05a04e89c, cn=Bhaurao Raghunath Gavit
Date: 2018.09.25 11:50:51 +05'30'

**(भा.र.गावित)**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.मंत्री (विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण) यांचे खाजगी सचिव.
४) मा.राज्यमंत्री (विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण) यांचे खाजगी सचिव.
५) सचिव, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
६) सर्व विभागीय आयुक्त, महाराष्ट्र राज्य
७) महालेखाकार (वित्त व लेखा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
८) सर्व जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, महाराष्ट्र राज्य
९) संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे.
१०) आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य पुणे.
११) आयुक्त, अपंग कल्याण, महाराष्ट्र राज्य पुणे.

१२) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१३) सर्व सहसचिव/उपसचिव/अवरसचिव/कक्ष अधिकारी, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) सर्व प्रादेशिक आयुक्त, समाज कल्याण
१५) सर्व सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण
१६) सर्व जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद
१७) सर्व संस्थाप्रमुख (मुख्याध्यापक, प्राथमिक/माध्यमिक/उच्च माध्यमिक आश्रमशाळा यांच्यामार्फत)
१८) मुख्याध्यापक, प्राथमिक/माध्यमिक/उच्च माध्यमिक आश्रमशाळा
१९) निवडनस्ती (विजाभज-२)